**अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका या पदावरील निवडीसाठी असलेली निवडसमिती दिनांक ३१ जानेवारी, २०११ पर्यंत गठित न झाल्यास जिल्हाधिकारी यांच्या स्तरावरुन कार्यवाही करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन परिपत्रक क्र.एबावि-२०१०/प्र.क्र.१७०/का.६
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ जानेवारी, २०११

**वाचा :-** १. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००९/प्र.क्र.७८/का.६, दिनांक ६ जुलै, २०१०
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००७/प्र.क्र.२६/का.६, दिनांक ५ ऑगस्ट, २०१०
३. शासन परिपत्रक, महिला व बाल विकास विभाग, क्र.एबावि-२०१०/प्र.क्र.१७०/का.६, दिनांक ७ ऑक्टोंबर, २०१०

**शासन परिपत्रक :-** वरील शासन निर्णय क्र.२ अन्वये अंगणवाडी सेविका व मदतनीस यांची निवडप्रक्रिया कशी करावी, याबद्दल स्पष्ट सूचना दिलेल्या आहेत. तसेच निवडप्रक्रिया लवकरात लवकर पूर्ण करण्याचीही सूचना दिलेली आहे. परंतु, अजूनही बहुतांश जिल्हयात निवडसमित्या स्थापन करण्यात आलेल्या नाहीत, म्हणून निवडप्रक्रिया पूर्ण करण्यात आलेली नाही. त्यामुळे माहे नोव्हेंबर, २०१० पर्यंत ८,३६७ अंगणवाडी केंद्र व २,४४२ मिनी अंगणवाडी केंद्र अद्यापही कार्यान्वित करावयाच्या शिल्लक आहेत, असे शासनाच्या लक्षात आलेले आहे.

२. नवीन अंगणवाडया कार्यान्वित न झाल्यामुळे केंद्र शासनाच्या "२० कलमी कार्यक्रम-२००६" या कार्यक्रमाखाली महाराष्ट्र राज्याचे कामकाज 'Poor' असे दाखविण्यात आलेले आहे. अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र कार्यान्वित करण्यासाठी त्या केंद्राकरिता मंजूर असलेल्या मानधनी पदावरील कर्मचा-यांची निवड करणे आवश्यक आहे. या मानधनी पदावरील निवडीसाठी असलेल्या निवडसमितीचे अध्यक्ष व एका अशासकीय सदस्याचे (पंचायत समिती सदस्य) नामनिर्देशन करण्याचे प्राधिकार संबंधित जिल्हयाचे मा. पालकमंत्री यांना आहेत. परंतु, ब-याचशा जिल्हयात निवडसमितीचे अध्यक्ष व अशासकीय सदस्याचे नामनिर्देशन करण्यात आलेले नसल्यामुळे निवडसमिती गठित झालेली नाही. त्यामुळे शासन याद्वारे सूचना देत आहे की, दिनांक ३१ जानेवारी, २०११ पर्यंत

निवडसमितीचे अध्यक्ष व अशासकीय सदस्याचे नामनिर्देशन संबंधित जिल्हयाचे मा. पालकमंत्री यांनी केले नाही तर, संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचेमार्फत अध्यक्षांची निवड करावी आणि त्यांच्यामार्फत निवडप्रक्रिया पूर्ण करुन सर्व मंजूर अंगणवाडी केंद्र / मिनी अंगणवाडी केंद्र कार्यान्वित करण्यात यावीत. संदर्भाधिन क्र.३ येथील शासन परिपत्रकानुसार निवडप्रक्रियेची कार्यवाही तात्काळ सुरु करण्याच्या सूचना यापूर्वीच देण्यात आल्या होत्या.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
(वन्दना कृष्णा)
प्रधान सचिव

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई - ३२
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई - ३२
सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री, तथा पालकंत्री, मंत्रालय, मुंबई - ३२
प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व मंत्रालयीन विभाग.
महासंचालक, महिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई - ३२
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण)
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.बॅरॅक नं.१,
योगक्षेम समोर, नरीमन पॉईंट, मुंबई - २०
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभवन,
एस.व्ही.पटेल रोड, मुंबई - ४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी,
जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई - १३
इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती,
टिळक भवन, दादर, मुंबई - २५
नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग,
नरीमन पॉईंट, मुंबई - २१
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई - २८
महिला व बाल विकास विभागातील सह सचिव / उप सचिव /
सर्व अवर सचिव व कार्यासने
निवड नस्ती (कार्यासन ६)